मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी नाथनगर (उ.) पैठण, औरंगाबाद या प्रशिक्षण संस्थेच्या कार्यक्रमातंर्गत मंजूर तरतूदीमधून इमारतींमधील विविध कामांकरिता निधी वितरित करणेबाबत ( सन २०२२-२३ ) कार्यक्रमांतर्गत

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
**शासन निर्णय क्रमांक : बीयुडी -२०२२/प्र.क्र.५१/२२/१२-अ,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च , २०२३

**संदर्भ :-** १. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं २०२२/प्र.क्र.४३ /अर्थसंकल्प ३, दि.०४.०४. २०२२.
२. शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.विअसु-२०१५/प्रक्र.२१८/इमारती-२ दि.१६.१२.२०१५
३. शासन निर्णय वित्त विभाग, क्र .विअप्र-२०१३/प्रक्र.३०/१३ /विनियम ( भाग-२) दि.२०.९.२०१९
४. संचालक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी नाथनगर (उ.) पैठण, औरंगाबाद यांचे पत्र क्र.मप्रविप्रप्र /आस्था /बांधकाम/कावि-५३/२०२२, दि.१५.१२.२०२१
५. शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक: बीयुडी -२०२२/प्र.क्र.५१/२२/१२-अ, दि.१४.१०.२०२२
६. शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक: बीयुडी -२०२२/प्र.क्र.५१/२२/१२-अ, दि.१८.०१.२०२३
७. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं २०२२/प्र.क्र.४३ /अर्थसंकल्प ३, दि.१६.०३.२०२३

**प्रस्तावना :-**

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी नाथनगर उ. पैठण, औरंगाबाद या संस्थेच्या १. प्रशासकीय इमारतीमध्ये सुरक्षा रक्षक कक्ष तयार करणे, (रु.०५.८८ लाख) २. प्रशासकीय व प्रशिक्षण इमारत या दोन्ही इमारतीमध्ये कॉमन टॉयलेट तयार करणे, ( रु.११.७५ लाख) ३. छताचे वॉटर प्रुफींग करणे,(रु.१५.२७ लाख) विविध दुरूस्तीविषयक बांधकामांकरिता एकूण रु. ३२.९० लाख इतक्या रक्कमेस संदर्भाधीन क्र.५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

२. या संस्थेच्या सदर खर्चासाठी मागणी क्र.ए-४, मुख्य लेखाशीर्ष "२०७०-इतर प्रशासनिक सेवा-००३-प्रशिक्षण-राज्य योजनांतर्गत योजना (००) (०४) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर उ. पैठण, औरंगाबाद, (२०७० ०६७५) सहायक अनुदान (कार्यक्रम) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशीर्षांतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता एकूण रु.३३.०० लाख इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर **रु.१३,८६,००० /- ( रुपये तेरा लाख, शहाऐंशी हजार फक्त) इतके अनुदान संबंधित लेखाशिर्षाखाली वितरित करण्याकरिता उपलब्ध करून दिले आहे.**

**३. आता, संदर्भाधीन क्र. ७ च्या** वित्त विभागाच्या दि.१६.३.२०२३ च्या शासन परिपत्रकान्वये कार्यक्रमांतर्गत सुधारित अंदाजानुसार रु.३३.०० लाख इतक्या तरतूदीनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर रु.२३.१० लाख इतका निधी ३१ सहायक अनुदान वेतनेतर म्हणून मंजूर झाला आहे. या तरतुदीमधून संदर्भाधीन क्र. ६ च्या शासन निर्णयान्वये **रु.१३.८६ लाख** इतका वितरित करण्यात आलेला निधी सुधारित अंदाजाच्या मर्यादेत उपलब्ध निधीमधून वजा करता रु. ९.२४ लाख इतका निधी संस्थेस वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संदर्भाधीन क्र.५ येथे नमूद शासन निर्णयान्वये विहित केलेल्या बांधकामाकरिता मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर उ. पैठण, औरंगाबाद, या संस्थेस सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात रु.३३,००,०००/- ( अक्षरी रुपये तेहत्तीस लाख मात्र ) इतक्या अर्थसंकल्पिय तरतुदीनुसार वित्त विभागाने सुधारित अंदाजाच्या मर्यादेत उपलब्ध करुन दिलेला **रुपये ६.९३ ( रुपये सहा लाख, त्र्याण्णव हजार फक्त ) /- इतका निधी** मागणी क्र.ए-४, मुख्य लेखाशीर्ष “२०७०-इतर प्रशासनिक सेवा-००३-प्रशिक्षण- राज्य योजनांतर्गत योजना (००) (०४) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर उ. पैठण, औरंगाबाद, (२०७० ०६७५) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशीर्षांतर्गत कार्यक्रमांतर्गत, या लेखाशिर्षाखाली, सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. यावर होणारा **रुपये ६.९३ ( रुपये सहा लाख, त्र्याण्णव हजार फक्त )** इतका खर्च मागणी क्र.ए-४, मुख्य लेखाशीर्ष " २०७०-इतर प्रशासनिक सेवा- ००३ प्रशिक्षण- राज्य योजनांतर्गत योजना (००) (०४) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद या संस्थेस सहायक अनुदान (२०७० ०६७५)-३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखा शिर्षाखाली २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

६. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

७. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र.४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार व सदर अधिकारातील रकाना क्र.५ व ६ खालील अटींच्या अधीन राहून प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन व वित्त विभागाच्या अनुक्रमे, अनौ.संदर्भ क्र.१४२/१४४३ दि.२३.०३.२०२३ , व अनौ.संदर्भ क्र.१९८/२०२३/व्यय-४ दि.२५.०३.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३२९१६१७१६८४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAUMUDI RAVINDRA MARGAJ

Digitally signed by KAUMUDI RAVINDRA MARGAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=86b41f0c8c4d9cee4d4b8d9e6a2f78b63ed85082bb42fbb618ff074d97dd8622, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=367FC9F5DAA15F4A0F19196A388639367A57BDA9ED0C495EA0C57DA461234AB8, cn=KAUMUDI RAVINDRA MARGAJ
Date: 2023.03.29 16:23:22 +05'30'

**( कौमुदी मरगज )**

**अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग.**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, /२ मुंबई, नागपूर,

२. विभागीय आयुक्त, औरंगाबाद.

३. उपमहासंचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,

४ संचालक , मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, औरंगाबाद

५ उप संचालक, लेखा व कोषागारे, औरंगाबाद

६ जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/ उप कोषागार कार्यालय, पैठण, जि.औरंगाबाद.

८. नियोजन विभाग, ( कार्यासन १४४३) मंत्रालय, मुंबई

९. वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई

१०. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई

११. निवडनस्ती (कार्या.१२-अ).